महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना अनुज्ञेय रक्कम मंजूर करणेबाबत.
**शिपाई भगत संतोष मनलाल, जि. गोंदिया**

**महाराष्ट्रशासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मगौपु-२०२१/प्र.क्र.२६३/का-२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २५/११/२०२१.

वाचा

१) शासननिर्णय,सामान्य प्रशासन विभागमगौपु-२०१७/प्र.क्र.३६०/२८,दिनांक ३१.०१.२०१९.
२) संचालक,सैनिक कल्याण विभाग,पुणे यांचे पत्र क्र.१६२११/गौ.पु/प्रस्ताव/सैकवि-१६/२२७१ दिनांक ०८/११/२०२१.

प्रस्तावना

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दि. ३१/०१/२०१९ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १६ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना शासकीय अनुदान देण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे.**शिपाई भगत संतोष मनलाल, जि. गोंदिया** यांना राष्ट्रपती सचिवालयाच्या आदेश क्र.सं. १५७-प्रेस/२०२०,दि.९जानेवारी, २०२१अन्वये**मेन्शान इन डिस्पॅच (शौर्यासाठी)** हे पदक प्रदान करण्यात आले आहे. संदर्भाधिन शासन निर्णयानुसार**शिपाई भगत संतोष मनलाल**यांना**रु.६,००,०००/-(रू.सहालाख फक्त)** इतके अनुदान देण्याचा प्रस्ताव संचालक,सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी उक्तसंदर्भ क्र.२च्या पत्रान्वये सादर केला आहे.

**शासन निर्णय**

उपरोक्त नमूद शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली अनुदानाची रक्कम देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | देय रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| नं.-२८१३२६५-डब्ल्यु, शिपाई भगत संतोष मनलाल ७ MARATHA LI Pin - ९११६०७ C/o ५६ APO | **मेन्शान इन डिस्पॅच (शौर्यासाठी)** | १५ऑगस्ट, २०२० | ६,००,०००/- |
| **एकूण रक्कम रूपये** | | | **६,००,०००/-** |

२. महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेअंतर्गत अनुज्ञेय ठरविलेल्या रक्कमेपैकी ५० % म्हणजे रु.३,००,०००/-(रू.तीन लाखफक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ५० % रक्कम म्हणजे

रु. ३,००,०००/-(रू. तीन लाखफक्त) मा.मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु. ३,००,०००/-(रू. तीनलाख फक्त)इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्णसर्वसाधारण सेवा, ८०० -इतरखर्च,(००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११३) ०५ - बक्षिसे' यालेखाशीर्षाखाली सन २०२१-२२यावित्तीयवर्षाकरीता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधूनभागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,**भंडारा-गोंदिया** यांना 'आहरण व संवितरण अधिकारी' म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.सदरची रक्कमत्यांनी आहरीत करुन संबंधितांना विहीत पध्दतीने वितरीत करावी.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय,**क्र मगौपु-२०१७ /प्र.क्र. ३६०/२८, दिनांक ३१.०१.२०१९**मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२५११३०७१२५१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Shivaji gulabrao gore

Digitally signed by Shivaji gulabrao gore
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=5a914ec7d72351a68d9f12e80317d7512bf6f19c34fee2557e3b3c882cce6f57, pseudonym=FBF0A6AA972F003B5B0C7967AD7B6A3C4FA38DC8, serialNumber=0FB38126D364A4D9F8873B7BC48B4369F1657CA258FC9C6479A27B4D539F409B, cn=Shivaji gulabrao gore
Date: 2021.11.25 13:12:19 +05'30'

**(शिवाजी गोरे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१.महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई,
२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई,
३.महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,
४.कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५.जिल्हाधिकारी,गोंदिया,
६.जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा-गोंदिया
७.संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८.जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,गोंदिया,
९.सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मुंबई.
११.नं.-२८१३२६५-डब्ल्यु, शिपाई भगत संतोष मनलालन ७ MARATHA LIPin -९११६०७C/o ५६ APO
१२.वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१३.प्रत संग्रहार्थ.